**मागासवर्गीय मुलांचे शासकीय वसतीगृह, पुर्णा, जि. परभणी या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत**

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः बीसीएच-२०१५/प्र.क्र.२४/बांधकामे

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ७ नोव्हेंबर,२०१५

**वाचा :-**

1. **शासन निर्णय, सा.न्या.व सां.का.व क्रि.वि.क्र.बीसीएच-२००५/प्र.क्र.५५४/मावक-४, दिनांक २८.७.२००७**
2. **शासनपत्र, सा.न्या.व वि.स.वि.क्र.बीसीएच-२०१०/प्र.क्र.१७९/मावक, दिनांक ३.११.२०१०**
3. **मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचे पत्र क्र.मुअऔ/२०१४/ का.१२/ इमा/नां-१६४, दिनांक १५.१.२०१५**
4. **आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचे पत्र क्र.सकआ/शिक्षण/शावगृ/२०१४-१५/१०० विद्यार्थी वगृह/पुर्णा-परभणी/२०४ पुणे,दिनांक २१.१.२०१५**

**प्रस्तावना :-**

१. मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांनी संदर्भीय दिनांक १५.१.२०१५ च्या पत्रान्वये केलेल्या प्रस्तावानुसार आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांनी संदर्भीय दिनांक २१.१.२०१५ च्या पत्रान्वये पुर्णा, जि.परभणी येथील १०० मागासवर्गीय मुलांच्या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास सु-सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

२. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दिनांक २८.७.२००७ च्या शासन निर्णयान्वये मागासवर्गीय मुलांमुलीसाठी नवीन १०० शासकीय वसतीगृहे आणि विभागीय स्तरावर मागासवर्गीय मुलांमुलींसाठी १००० विद्यार्थी क्षमतेची नवीन शासकीय वसतीगृहे सुरु करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यामध्ये पुर्णा, जि.परभणी येथील १०० मागासवर्गीय मुलांच्या वसतीगृहाच्या रु.३२६.९२ लक्ष एवढया

किंमतीच्या ढोबळ अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानंतर शासनाच्या संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये सदर वसतीगृहाच्या वाढीव बांधकामाच्या रु.१०३.०० लक्ष इतक्या वाढीव खर्चास मान्यता देण्यात आली आहे. तद्‌नंतर मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांनी मुख्य इमारतीच्या बांधकामाच्या किंमतीत झालेली वाढ, अधिक दराची निविदा स्विकृती, प्रत्यक्ष काम करतेवेळी मंजूर केलेल्या अतिरीक्त बाबी, निविदेमध्ये झालेली वाढ, भाववाढ, बाह्य विद्युतीकरण, ५% सेंन्टेज चार्जेस इ. बाबीमुळे सदरहु इमारत बांधकामाचे एकुण रु.५८०.१६ लक्ष इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास सु-सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्या मार्फत शासनास सादर केला आहे. प्रस्तावासोबत विहीत प्रपत्रातील माहिती, तुलनात्मक गोषवारा, तांत्रिक मान्यता आदेश, दरवाढीचा गोषवारा इ. कागदपत्र सादर केलेली आहेत. प्रस्तुत इमारतीचे बांधकाम भौतिकदृष्ट्या पुर्ण झालेले असुन, सदरहू इमारत बांधकाम वापरात आणण्याच्या दृष्टीने, सचिव समितीने दिनांक ८.९.२०१५ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार पुर्णा, परभणी येथील १०० मागासवर्गीय मुलांच्या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाच्या रु.५८०.१६ लक्ष इतक्या सुधारीत अंदाजपत्रकास सु-सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती..

**शासन निर्णय:-**

३. पुर्णा, जि.परभणी येथील १०० मागासवर्गीय मुलांच्या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाच्या सुधारीत प्रशासकीय मान्यता रुपये ४,२९,९२,०००/- रक्कमेमध्ये रुपये १,५०,२४,०००/- इतकी वाढ करुन येणाऱ्या रुपये रु.५,८०,१६,०००/- (अक्षरी रुपये पाच कोटी ऐंशी लक्ष सोळा हजार फक्त ) इतक्या रक्कमेस या शासन निर्णयान्वये सु-सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. पुर्णा, जि.परभणी येथील १०० मागासवर्गीय मुलांच्या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाच्या सु-सुधारीत अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा खालील प्रमाणे आहे:-

**GENERAL ABSTRACT FOR PURNA, PARBHANI HOSTEL BLDG. RE-REVISE A.A.**

| Sr. No | DESCRIPTION OF ITEMS | A.A. AMOUNT (Rs.in Lacs) | Re-Revise AMOUNT (Rs.in Lacs) | EXCESS (Rs.in Lacs) | % EXCESS Over A.A. | REASONS OF EXCESS |
|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | |
| 1 | Main Building Supply and Drainage | 287.50 | 276.78 | -10.72 | -2.49 | बचत |
| 2 | Electrification | | | | | |
| | a)External | - | 19.60 | 19.60 | +4.55% | मूळ अंदाज पत्रकात अंदाज पत्रकात तरतुद नव्हती, इमारत कार्यान्वित होण्या साठी बाह्य विद्युतीकरण अत्यावश्यक |
| | b) Internal | 14.35 | 9.15 | -5.20 | -1.2% | बचत |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| 3 | Computerizing | 5.75 | - | -5.75 | -1.33% | बचत |
| 4 | Misc. Work Internal Road | 11.00 | 10.00 | -*1.00 | -0.23% | बचत |
| 5 | Solar Passive Architecture | 5.00 | -- | -5.00 | -1.16% | बचत |
| 6 | Higher Tender Rates | - | 86.00 | +86.00 | +20.00% | मुळ अंदाज सन २००८-०९ च्या दरसूचीवर, जमीन उपलब्ध न झाल्याने निविदेस ४ वर्षे विलंब, सन २०११-१२ च्या नवीन दरसूचीवर ४.७७% अधिक दराने शासनाने निविदा मंजूर केल्याने अधिक्य झाले . |
| 7 | Escalation | 28.75 | 30.95 | +2.20 | +0.51% | भाव वाढ झाल्यामुळे |
| 8 | Clause - 38 | 10.00 | 18.46 | +8.46 | +1.96% | काम करतांना काही बाबींचे परिमाण जास्त झाल्यामुळे |
| 9 | Contingency | 11.50 | -- | -11.50 | -2.67% | बचत |
| 10 | External Water Supply | 4.00 | 30.02 | +26.02 | +6.05% | बाह्य पाणी पुरवठा न.पा. च्या टाकी तुन करण्यात आल्याने वाढ झाली आहे |
| 11 | Garden | 6.00 | 13.99 | +7.99 | +1.85% | इमारत परिसरा तील मोकळया जागेत बगीचा. |
| 12 | Paver Block | 5.00 | 6.34 | +1.34 | +0.31 | प्रत्यक्ष कामानुसार वाढ |
| 13 | EIRL | 20.50 | 51.25 | +30.76 | +7.15% | अतिरिक्त कामे सुचविल्यामुळे जास्तीचा खर्च झाला. |
| 14 | Centage Charges 5% | 20.57 | 27.62 | +7.05 | +1.63% | प्रत्यक्ष कामानुसार वाढ |
| | **Total -:** | **429.92** | **580.16** | **150.24** | **34.94%** | |

५. उपरोक्त सु-सुधारीत प्रशासकीय मान्यतेनुसार पुर्णा येथील वसतीगृहाच्या इमारत बांधकामासाठी यापुर्वी वितरीत करण्यात आलेला रुपये ४२९.९२ लक्ष निधी वजा जाता रुपये १५०.२४ लक्ष इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यात येईल.

६. यावर होणारा खर्च मागणी क्र. एन-४, मुख्य लेखाशिर्ष ४२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती आणि इतर मागासवर्ग यांच्या कल्याणावरील भांडवली खर्च, २७७-शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०३) मागासवर्गीय मुलांमुलींसाठी शासकीय वसतीगृह बांधणे (४२२५ ०४८१), ५३-मोठी बांधकामे या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून तो सन २०१५-१६ या वित्तीय वर्षात करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात यावा.

७. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, २९७८, भाग पहिला, उप विभाग- पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन तसेच मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील सचिव समितीने दिनांक ८.९.२०१५ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०७१५००३३१९२२ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrakant Haridas Wade

Digitally signed by Chandrakant Haridas Wade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9474e7143b2bc3fd96e8d7bf07d1ce51de8461d4c34ae1e3f643c11b54523936, cn=Chandrakant Haridas Wade
Date: 2015.11.17 12:54:17 +05'30'

**( चंद्रकांत ह. वडे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) आयुक्त, समाजकल्याण, पुणे
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद.
५) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद.
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, परभणी.
७) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा / लेखाअनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
८) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, औरंगाबाद.
९) सहायक आयुक्त, समाजकल्याण, परभणी.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.